सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने.
मागणी क्र.एल-२,"२०५३, जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा आस्थापना (०६) (०१) पंच,सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण- राज्यक्षेत्र, ३१- सहाय्यक अनुदान (वेतन), ३६-सहाय्यक अनुदान(वेतनेतर)
(संकेतांक क्र. २०५३ ०५७ ४)(योजनेत्तर)(दत्तमत)
(दुसरा हप्ता) (जून ते नोव्हेंबर, २०१५)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अनुपं-२०१५/प्र.क्र.८३/योजना-४
बांधकाम भवन, तळ मजला, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: १३ जुलै, २०१५

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग- प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि.१७.०९.१९९३
२) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग-प्रशिक्षण ११९९/प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३.९.१९९८.
३) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग -प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१
४) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग-अनुपं-२०१५/प्र.क्र.८३/योजना-४, दि. २ मे,२०१५.

शासन निर्णय -

सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षाकरिता मुख्य लेखाशिर्ष मागणी क्र.एल-२,"२०५३ ,जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा आस्थापना (०६) (०१) पंच,सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण- राज्यक्षेत्र, ३१-सहाय्यक अनुदान, ३६-सहाय्यक अनुदान(वेतन) (संकेतांक क्र.२०५३ ०५७४) (योजनेतर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांसाठी वेतनेतरसाठी रुपये ३६.८० लक्ष व वेतनासाठी रुपये २३३.०६ लक्ष असे एकूण रुपये २६९.८६ लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पित केली आहे.

२. ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांसाठी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरिता एप्रिल ते मे, २०१५ या कालावधीकरिता वेतनेतरकरिता रुपये ६.१४ लक्ष व वेतनासाठी रुपये ३८.८४ लक्ष असे एकूण रुपये

४४.९८ लक्ष अनुदान दिनांक २ मे,२०१५ च्या शासन निर्णयान्वये पहीला हप्ता म्हणून वितरीत करण्यात आले आहे. आता माहे जून ते नोव्हेंबर,२०१५ या सहा महिन्याकरिता वेतनेतरकरिता रु. १८.४२ लक्ष व वेतनाकरिता रु.११६.५२ लक्ष असे एकूण रु.१३४.९४ लक्ष अनुदान दुसऱ्या हप्त्यासाठी उपलब्ध करुन दिले आहे. सदरहू अनुदान पंच,सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना जून ते नोव्हेंबर या कालावधीकरिता शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत आहे.

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण ११९८/प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३ सप्टेंबर १९९८ व शासन परिपत्रक क्र. प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि. १२ जून, २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुषंगाने सर्व संबंधित उपायुक्त (आस्था) यांनी सदर संस्थेस अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ १ येथे दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. हा खर्च मागणी क्र.एल-२,"२०५३ ,जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा आस्थापना (०६) (०१) पंच,सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण- राज्यक्षेत्र, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), ३६-सहाय्यक अनुदान (वेतन) (संकेतांक क्र. २०५३ ०५७४) (योजनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो या लेखाशीर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे, त्याबाबतचा ताळमेळ घेऊन त्याबाबत खातरजमा करुन शासनास कळविण्याबाबत विभागीय आयुक्तांनी संबंधितांना सूचना द्याव्यात.

५. विभागीय आयुक्त कार्यालयाने पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांना अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. मात्र सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांनी वेतनाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतनाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्रांच्या प्राचार्यांची असेल.

६. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्यत-हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत/ सुविधा पुरवतील.

७. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १५/५/२००९ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. १ परि. १६२, १६३, १६४ नुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून व वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक -अर्थसं-२०१५/ प्र.क्र.८५/ अर्थसंकल्प-३, दि.१७ एप्रिल, २०१५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१३१०३११५३९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Bhagawan Bayaji Mahale

Digitally signed by Bhagawan Bayaji Mahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagawan Bayaji Mahale
Date: 2015.07.15 12:12:46 +05'30'

**(भ. ब. महाले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई, पुणे, औरंगाबाद, नाशिक, अमरावती व नागपूर (प्रत्येकी २ प्रती)
२. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, नवी मुंबई, पुणे, औरंगाबाद, नाशिक, अमरावती व नागपूर.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर/सातारा/ कोल्हापूर/सोलापूर/ जळगांव/लातूर/ बुलढाणा/ अमरावती/यवतमाळ/नागपूर व चंद्रपूर.
४. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई.
५. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर .
६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे .
७. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५ .
८. प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र (सर्व)
९. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७, वित्त-८ ग्राम विकास व जलसंधारण विभाग (२ जादा प्रतींसह)
१०. निवडनस्ती का.क्र. योजना-४

## परिशिष्ट

| | शासन निर्णय क्र.अनुपं.२०१५/प्र.क्र.८३/योजना-४,दि. १३ जुलै,२०१५ | | | |
|---|---|---|---|---|
| | जून,२०१५ ते नोव्हेंबर,२०१५ या कालावधीतील दुसऱ्या हप्त्याचे वितरण (रु. लक्षात) | | | |
| अ.क्र. | पंचायत राज प्रशिक्षण केंद्राचे नाव | वेतनेतर | वेतन | एकूण |
| १ | कोसबाड हिल, जि.पालघर | १.६७ | ८.५० | १०.१७ |
| **अ)** | **विभागीय आयुक्त, कोकण** | **१.६७** | **८.५०** | १०.१७ |
| २ | वर्ये, जि.सातारा | १.६७ | १०.०० | ११.६७ |
| ३ | गारगोटी, जि.कोल्हापूर | १.६७ | १२.५० | १४.१७ |
| ४ | गौडगांव, जि.सोलापूर | १.६७ | ९.०० | १०.६७ |
| **ब)** | **विभागीय आयुक्त, पुणे** | **५.०१** | **३१.५०** | ३६.५१ |
| ५ | मुरुड, जि.लातूर | १.६७ | १५.४५ | १७.१७ |
| **क)** | **विभागीय आयुक्त, औरंगाबाद** | **१.६७** | **१५.४५** | १७.१७ |
| ६ | हनुमान नगर, जि.नागपूर | १.६७ | ९.५८ | ११.१७ |
| ७ | मूल, जिल्हा चंद्रपूर | १.७२ | ९.५० | ११.२२ |
| **ड)** | **विभागीय आयुक्त, नागपूर** | **३.३९** | **१९.०८** | २२.३९ |
| ८ | खिरोदा, जि.जळगाव | १.६७ | ८.०० | ९.६७ |
| **इ)** | **विभागीय आयुक्त, नाशिक** | **१.६७** | **८.००** | ९.६७ |
| ९ | खामगांव, जि.बुलढाणा | १.६७ | १२.८५ | १४.५४ |
| १० | शिवाजीनगर, जि.अमरावती | १.६७ | ९.०० | १०.६७ |
| ११ | पुसद, जि.यवतमाळ | १.६७ | १२.१४ | १३.८२ |
| **ई)** | **विभागीय आयुक्त, अमरावती** | **५.०१** | **३३.९९** | **३९.०३** |
| | **अ)+ब)+क)+ड)+इ)+ई)** | **१८.४२** | **११६.५२** | **१३४.९४** |